मंत्रालय आहारगृह/उपाहारगृहामध्ये निर्माण होणाऱ्या ओल्या कचऱ्यावर प्रक्रीया करण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पासाठी मागविण्यात आलेल्या निविदेतील निविदाकाराची निवड करण्यासाठी तांत्रिक समिती व खरेदी समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.४७५/१७/मंउका**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालयामधील आहारगृह/उपाहारगृहामधील खाद्यपदार्थामुळे दररोज सर्वसाधारणपणे ५०० ते ७०० किलो ओला कचरा निर्माण होतो. सदर कचरा बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत विल्हेवाट लावण्यासाठी नेला जातो. केंद्र शासनाच्या पर्यावरण, वन विभागामार्फत दिनांक ८/०४/२०१६ च्या राजपत्रान्वये घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१५ लागू करण्यात आले असून त्यानुषंगाने बृहन्मुंबई महानगर पालिकेने शहरात निर्माण ओल्या कचऱ्याची विल्हेवाट लावण्यासंदर्भात नगरपालिका घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ अनुसार तरतूदी विहित केलेल्या आहेत. त्यानुषंगाने मंत्रालय आहारगृह/उपाहारगृहात होणारा ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया करण्यासाठी इच्छूक कंपन्या/ संस्थांकडून निविदा मागविण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार मंत्रालय उपाहारगृहातील ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया करण्यासाठी योग्य तांत्रिक बाबींचा व कमी खर्चाचा प्रकल्प स्थापित करण्यासाठी त्या क्षेत्रातील संस्थांकडून ईनिविदा मागविण्यात आल्या आहेत. सदर निविदेतील तांत्रिक बाबी तसेच कागदपत्रांची छाननी करुन पात्र निविदाकाराची निवड करणे इत्यादी बाबींसाठी तांत्रिक समिती व खरेदी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहारगृह/उपाहारगृहामध्ये निर्माण होणाऱ्या ओल्या कचऱ्यावर प्रक्रिया करण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पासाठी मागविण्यात आलेल्या निविदेतील तांत्रिक बाबींची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे तांत्रिक समिती गठीत करण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १ | सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे) | अध्यक्ष |
| २ | सहसचिव/उपसचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ३ | सहसचिव/उपसचिव, नगरविकास विभाग (नवि-३४), मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ४ | सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (प्रशा-४), मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ५ | सहसचिव/उपसचिव , पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | सहसचिव/उपसचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी.रुग्णालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ७ | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर, बांधकाम भवन, मर्झबान रोड, मुंबई | सदस्य |
| ८ | कार्यकारी अभियंता (घनकचरा व्यवस्थापन), ए-वार्ड, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| ९ | महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे | सदस्य सचिव |

२. प्रस्तुत निविदेतील तांत्रिक समितीने छाननी करुन पात्र ठरविलेल्या निविदाकारांची वाणिज्यक निविदा उघडून पात्र निविदाकारांची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे खरेदी समिती गठीत करण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १ | सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे) | अध्यक्ष |
| २ | उद्योग सहसंचालक (विभागीय कार्यालय), उद्योग संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ३ | विभागीय अधिकारी (लेखा व कोषागारे विभाग), संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई | सदस्य |
| ४ | सहसचिव/उपसचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ५ | सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (प्रशा-४), मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ६ | महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे | सदस्य सचिव |

४. सदर समितीने उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयासोबतच्या खरेदी नियम पुस्तिकेतील तरतूदीनुसार निविदा प्रक्रिया अंतिम करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१२१७१५४८०७५९०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dadasaheb Sopan Khatal

Digitally signed by Dadasaheb Sopan Khatal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a310d57c42fb870fa7e7090329a6f40b05dc84ae61a81ed6b8634847 54bf19f1, serialNumber=8fe4511535712fe1236ed1973e619df1ad75bb7f10264e1988427f9496819bf2, cn=Dadasaheb Sopan Khatal
Date: 2018.12.17 15:56:20 +05'30'

**( दा.सो.खताळ )**
**महाव्यवस्थापक तथा अवर सचिव**
**मंत्रालय उपाहारगृह**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

२) सहसचिव (उपाहारगृहे), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

३) सहसचिव/उपसचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई

४) सहसचिव/उपसचिव, नगरविकास विभाग (नवि-३४), मंत्रालय, मुंबई

५) सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (प्रशा-४), मंत्रालय, मुंबई

६) सहसचिव/उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई

७) सहसचिव/उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ७ वा मजला, जी.टी.रुग्णालय संकुल, एल.टी.मार्ग, मुंबई

८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

९) उद्योग सहसंचालक, उद्योग संचालनालय, मुंबई

१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर, बांधकाम भवन, मर्झबान रोड, मुंबई

११) कार्यकारी अभियंता (घनकचरा व्यवस्थापन), ए-वार्ड, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई ,

१२) महाव्यवस्थापक (उपाहारगृहे), मंत्रालय, मुंबई

१३) व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह/विधानभवन उपाहारगृह

१४) निवडनस्ती.